“नियमीत लसीकरण” विषयी राज्यात जनजागृती करणेच्या उपक्रम अंमलबजावणीस मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय, क्रमांकः आयईसी २०१७/प्र.क्र. १४६ /आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २८ ऑगस्ट, २०१७.

वाचा :

१) आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक- राआसो/आरसीएच/IEC/प्रस्ताव/१२५१६-१७/१७, दिनांक ०६.०६.२०१७.

२) राज्य आरोग्य क्षण व संपर्कविभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक- उपसंआसे/राआशिवसंवि/ प्रसिध्दी /लसीकरण/आयईसीकृयो/१७, दिनांक १९.०७.२०१७.

**शासन निर्णय:**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत नियमीत लसीकरण कार्यक्रमाविषयी प्रसिध्दी व जनजागृतीसाठी राबविण्यात येणा-या उपक्रमांस आणि त्यासाठी करावयाच्या एकलस्त्रोत खरेदीस खालीलप्रमाणे अनुदान खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उपक्रम | तपशिल | रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| १ | राज्यातील जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी निवडक एसटी स्टँडवरील होर्डींग्जवर नियमीत लसीकरविषयी संदेश प्रदर्शित करुन प्रसिध्दी करणे | होर्डींग्जचा आकार २० फुट x १० फुट चार रंगात सचित्र आधुनिक पध्दतीने फ्लेक्सव्दारे संदेश प्रदर्शित करणे.<br>**१)जिल्हा एसटी स्टँडवरील होर्डींगचा खर्च- प्रतिहोर्डींग प्रतिमहिना-**<br>भाडे- रु.३६००० <br>माउंटींग चार्जेस - रु.१५००/- | ९८.४९ |

| अ.क्र. | उपक्रम | तपशिल | रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| | | पेंटींग चार्जेस- रु.४०००/-<br>एकूण - रु.४१५००<br>जी.एस.टी. १८ % - रु.७४७०/-<br>एकूण सर्व - रु.४८९७०/-<br>सर्व जिल्हा मुख्यालयांच्या ४८ एसटी स्टँडवरील होर्डीग्जसाठी प्रतिमहिना खर्च-<br>**रु.४८९७० x ४८ = रु. २३५०५६०/-**<br>**२. तालुका एस.टी. स्टँडवरील होर्डींगचा खर्च- प्रतिहोर्डींग प्रतिमहिना-**<br>भाडे- रु.३००००<br>माउंटींग चार्जेस - रु.१५००/-<br>पेंटींग चार्जेस- रु.४०००/-<br>एकूण - रु.३५५००<br>जी.एस.टी. १८ % - रु.६३९०/-<br>एकूण सर्व - रु.४१८९०/-<br>निवडक १७९ तालुका मुख्यालयांच्या एसटी स्टँडवरील होर्डीग्जसाठी प्रतिमहिना खर्च-<br>**रु.४१८९० x १७९ = रु. ७४९८३१०/-**<br>वरीलप्रमाणे जिल्हा व तालुका मुख्यालय येथील एसटी स्टँडवरील एकूण २२३ होर्डींग्जवर नियमीत लसीकरणाविषयी संदेश प्रदर्शित करणे.<br>सदर काम महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाने एकाधिकृत केलेल्या मे मुंबई या ,ओम ॲडव्हर्टायझर्स. संस्थेमार्फत काम करून घेण्यात यावे. | |
| २ | राज्यातील मुंबई वगळता इतर सर्व महानगरपालिका कार्यक्षेत्रातील म.न.पा.च्या व एस.टी.महामंडळाच्या बसेसवर संदेश प्रदर्शित करुन प्रसिध्द | मंजूर निधीच्या अधीन राहून एक महिण्यासाठी मनपा कार्यक्षेत्रातील कार्पोरेशनच्या बसेसवर नियमीत लसीकरणाविषयी संदेश प्रदर्शित करणे.<br>अ)सदर काम खाली नमूद केल्यानुसार संबंधीत म.न.पा.कार्यक्षेत्रासाठी बसेसवर संदेश प्रदर्शीत | ६६.०४ |

| अ.क्र. | उपक्रम | तपशिल | रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| | करणे | करण्यासाठी असलेल्या Sole rights संस्थेमार्फत करुन घ्यावे.<br>१) मनपा, ठाणे - मे.ॲक्सेल ॲड.ठाणे (वेस्ट), २)सोलापूर - प्रो- ॲक्टीव्ह इन अँड आऊट ॲड.विलेपार्ले, मुंबई,<br>३)पुणे- पायोनियर पब्लिसीटी कार्पो.प्रा.लि.पुणे<br>४)कोल्हापूर - मे. आऊटदेअर,कोल्हापूर<br>५)कल्याण - मे.सन एन ॲड स्टार ॲड.प्रा.लि. पुणे<br>आ) उर्वरीत मनपा कार्यक्षेत्रातील महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाच्या निवडक एस.टी.बसेसवर महामंडळाने एकाधिकृत केलेल्या मे.राकेश ॲडव्हर्टायझर्स, मुंबई या संस्थेकडून करून घ्यावे. | |
| ३ | राज्य परिवहन महामंडळाच्या प्रवासी एस.टी.बसेसमध्ये लसीकरणाचे काम कमी असणा-या जिल्हयांमध्ये आसनाच्या पाठीमागे, हॅन्डलवर संदेश प्रदर्शित करुन प्रसिध्द करणे | एस.टी.बसमध्ये आसनाच्या पाठीमागे ३०० मी.मी.x ६०० मी.मी. व ३५० मी.मी.x ५९० मी.मी.आकाराचे संदेश प्रदर्शीत करणे. (एका बसवर एक महिण्यासाठी संदेश प्रसिध्द करण्याचा खर्च प्रती बस ३८ आसनप्रमाणे)<br>प्रदर्शन भाडे रु.५४००/-<br>+ प्रिंटींग चार्जेस- २८५०/- (प्रती सीट रु.७५/-)<br>+संदेश फिक्सींग चार्जेस रु.७६००(प्रती सीट रु.२००/)<br>------------------------------------------<br>एकूण रु. १५८५०/-<br>+१८% जीएसटी = २८५३<br>--------------------------------------<br>**एकूण सर्व रु. १८७०३/-**<br>याप्रमाणे एकूण १७६ बसेसवर संदेश प्रदर्शित करणे. सदर काम एसटी बसेसमध्ये सीटच्या मागे संदेश प्रदर्शीत करण्यासाठी नियुक्त मे.ओम ॲडव्हर्टायझींग या sole right संस्थेकडून | ३२.९२ |

| अ.क्र. | उपक्रम | तपशिल | रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| | | त्याचेकडील दरानुसार करुन घेण्यात यावे. | |
| ४ | दुरदर्शन, खाजगी न्युज चॅनल्स व मनोरंजन चॅनल्स वरुन टि.व्ही.स्पॉट प्रसारण करणे | आयबीएन लोकमत, एबीपी माझा, टीव्ही ९ महाराष्ट्र, झी २४ तास हे मराठी न्युज चॅनल्स तसेच झी मराठी, साम मराठी, ९ एक्स झकास, कलर्स, स्टार प्रवाह इ.मनोरंजन वाहिण्यांवरुन नियमीत लसीकरविषयी माहितीच्या टी.व्ही.स्पॉटचे प्राईम टाईममध्ये मंजूरनिधीमध्ये बसतील तेवढे दिवस प्रसारण करणे.<br>सदर काम डायरेक्टोरेट ऑफ ऑडीओ व्हीज्युअल, नवी दिल्ली DAVP यांचे मान्य दरानुसार करुन घ्यावे. | २५.२० |
| ५ | पोस्टर्सवर संदेश छापून प्रसिध्द करणे | १८”x२३” आकाराचे रंगीत सचित्र ४ रंगात छपाई (१०० जीएसएम पेपर्सवर पुढील बाजूने लॅमिनेशन व पाठीमागील पांढ-या बाजूस वर व खाली गमिंग पट्टी असलेले)<br>ई-निविदाव्दारे मंजूरनिधीमध्ये बसतील तेवढे नग तयार करुन जिल्हयांना वाटप करण्यात येईल | ९.०० |
| ६ | संदेशाची डिजीटल पीव्हीसी बॅनर्स छपाई करुन जिल्हयांना पुरवठा करणे | **आकार** - ५ फूट x ३ फूट = १५ स्क्वे.फुट<br>**छपाई**- ४ रंगात सचित्र, अडकवण्यासाठी आयलेट सुविधा.<br>**एकूण संख्या**- ६४०७५ बॅनर्स<br>(प्रति स्क्वे.फुट दर रु.७.१०/- टक्के जीएसटी १२ प्रमाणे (नुसार १५ स्क्वे.फुट आकाराच्या एका बॅनरसाठी रु.१०६.५०/- इतका खर्च)<br>शासन निर्णय, सा.प्र.वि. दि.१४.०७.२०१६ नुसार बॅनर्स छपाई करुन पुरवठा करण्यासाठी मे.कल्याणी कार्पोरेशन पुणे ही संस्था नियुक्त करण्यात आली आहे. सदर संस्थेच्या दरानुसार मंजूर निधीमध्ये बसतील तेवढे बॅनर्स तयार करून जिल्हयांना पुरवठा करण्यात यावा. | **६८.२४** |
| | | **एकूण** | **२९९.८९** |

२.अटी व शर्ती-:

१. सदर खरेदीसाठी शासन निर्णय, उदयोग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग III/उदयोग-४, दि.०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. एकलस्त्रोत खरेदीबाबत सदर शासन निर्णयामधील “शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका” यात नमूद परिच्छेद क्रमांक ३.२.३ येथील तरतुदीनुसार तसेच विहित कार्यपध्दतीस अनुसरुन करण्यात यावी.

२. खरेदी करावाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) संबंधीत तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश के कोणत्याही कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच त्याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३. प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत.त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधीत पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

४. खरेदी करण्यात येणा-या बाबींची पुरवठापुर्व /पुरवठयानंतर नमुना तपासणी (Pre/post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विर्निदेश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात यावी.

५. खरेदी करण्यात येणा-या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (Storage and Distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply Chain management) व वस्तुसुची व्यवस्थापन (inventary Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहित मुदतीत वापर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर खरेदीची व्दिरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

७) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबवितांना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

८. शासननिर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ समोरील स्तंभ क्रमांक ६ मधील अटींची पूर्तता करण्यात यावी.

९. खरेदी प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमीत करण्यात यावेत.

३. वर नमूद उपक्रमांसाठीचा खर्च आयईसी पीआयपी सन २०१६-१७ मधील B १०.३.२.१ या FMR Code खाली मंजूर असलेल्या व सन २०१७-१८ या वर्षात Committed Expenditure म्हणून ठेवण्यात आलेल्या रु.२९९.८९ लक्ष या निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासननिर्णय, शासननिर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२८१२१६३२५३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.08.28 16:35:49 +05'30'

**(रो.दि.कदम पाटील)**
अवरसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. उप संचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).